"महिला सन्मान योजना" अंतर्गत महाराष्ट्र राज्यातील रा.प.महामंडळाच्या बसेसमधून प्रवास करणाऱ्या महिलांना रा.प. महामंडळाच्या सर्व प्रकारच्या बसेसमध्ये ५०% प्रवास सवलत अनुज्ञेय करणेबाबत.........

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. एसटीसी-०३२३/प्र.क्र.१३५/परि-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०३ एप्रिल, २०२३

संदर्भ :- १) शासन निर्णय क्र.एसटीसी-३४००/६३१/प्र.क्र.३१/परि-१, दि.२०.०६.२०००.
२) शासन निर्णय क्र.एसटीसी-३४०१/प्र.क्र.४२/भाग-१/परि-१, दि.०५.१२.२००५.
३) शासन निर्णय क्र.एसटीसी-३४०५/५१५/परि-१,दि.२६.०७.२००६.
४) शासन निर्णय क्र.एसटीसी-०११३/प्र.क्र.१०३/परि-१,दि.१०.०२.२०१४
५) मा.मंत्री(वित्त) यांचे अ.शा.पत्र क्र.संकिर्ण २०१४/ प्र.क्र.५२/ अर्थबळ,दि.२८.०७.२०१५.
६) शासन निर्णय क्र.एसटीसी-०८१५/प्र.क्र.५५०/परि-१,दि.२५.०२.२०१६.
७) शासन निर्णय क्र.एसटीसी-०२१६/प्र.क्र.७०/परि-१,दि.०३.०५.२०१६.
८) शासन निर्णय क्र.एसटीसी-१०१७/प्र.क्र.५२५/परि-१,दि.०९.०८.२०१८.
९) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे परिपत्रक क्र.राप/वाह/सवलत/म.स.यो./१०७८, दि.१६.०३.२०२३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याचे मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री महोदयांनी महाराष्ट्र राज्याच्या सन २०२३-२०२४ च्या अर्थसंकल्पामध्ये **" महिलांना राज्य परिवहन महामंडळाच्या बस प्रवासात तिकीट दरात सरसकट ५० टक्के सवलत देण्यात येईल"** अशी घोषणा केली आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्यातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसमधून प्रवास करणाऱ्या महिलांना राज्य परिवहन महामंडळाच्या सर्व प्रकारच्या बसेसच्या तिकीट दरात ५० टक्के प्रवास सवलत अनुज्ञेय करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

"महिला सन्मान योजना" अंतर्गत महाराष्ट्र राज्यातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसमधून प्रवास करणाऱ्या महिलांना राज्य परिवहन महामंडळाच्या सर्व प्रकारच्या बस प्रवासातील तिकीट दरात ५० टक्के प्रवास सवलत अनुज्ञेय करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

त्यानुसार खालील सुचना देण्यात येत आहेत -:

१. "महिला सन्मान योजना" अंतर्गत महाराष्ट्र राज्यातील राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसमधून प्रवास करणाऱ्या महिलांना रा.प. महामंडळाच्या सर्व प्रकारच्या (साधी, मिडी/मिनी, निमआराम, विनावातानुकुलीत शयन-आसनी, शिवशाही (आसनी), शिवनेरी, शिवाई (साधी व वातानुकुलीत) इत्यादी.) बस प्रवासातील तिकीट दरात ५०% सवलत दि. १७.०३.२०२३ पासून अनुज्ञेय करण्यात येत आहे.

२. सदरची सवलत महाराष्ट्र राज्याच्या हद्दी पर्यंत अनुज्ञेय राहील.

३. सदर सवलत शहरी वाहतुकीस अनुज्ञेय राहणार नाही.

२. वरील प्रवास सवलतीवरील खर्च मागणी क्र.बी-३ २०४१, वाहनांवरील कर, ००, ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त (दत्तमत) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य यामधील तरतुदीमधून भागविण्यात येईल.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६०/२०२३/व्यय-८, दिनांक २४. ०३. २०२३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०४०३१८२५४७६१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA MENDHE GANVIR

Digitally signed by SARIKA MENDHE GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA MENDHE GANVIR
Date: 2023.04.03 18:31:27 +05'30'

**( सारिका मेंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
५. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१०. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१२. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१३. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१५. निवडनस्ती, कार्यासन, परिवहन- १, गृह विभाग,मंत्रालय, मुंबई-३२